**<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाअंतर्गत होणाऱ्या विविध कामांच्या अनुषंगाने तांत्रिक मान्यता प्रदान करणारी यंत्रणा निश्चित करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक धोरण-२०१७/प्र.क्र.६०/नवि-१६**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- १६ मे, २०१७**

**<u>प्रस्तावना</u> :-**

राज्यातील विविध नगरपरिषदा/नगरपंचायतींना राज्य शासनाकडून वैशिष्ट्यपूर्ण योजना, विशेष रस्ता अनुदान, आण्णा भाऊ साठे नागरी वस्ती सुधार योजना, जिल्हा नगरोत्थान अशा योजनेमधून निधी वितरीत करण्यात येतो. स्थापत्य कामांबाबतची (Civil Works) राज्य शासन स्तरावरील कार्यवाही ही सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत होते. त्यामुळे स्थापत्य कामांना तांत्रिक मान्यता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या यंत्रणेकडून घेणे आवश्यक ठरते. मात्र, काही प्रकरणात सार्वजनिक बांधकाम विभागा व्यतिरिक्त अन्य यंत्रणेकडून तांत्रिक मान्यता घेण्यात येत असल्याचे व त्या आधारे कामांना प्रशासकीय मंजुरी दिली जात असल्याचे निदर्शनास आले आहे. या परिस्थितीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाअंतर्गत होणाऱ्या विविध कामांच्या अनुषंगाने तांत्रिक मान्यता प्रदान करणारी यंत्रणा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या परिस्थितीत स्थापत्य कामांबाबत तांत्रिक मान्यता सार्वजनिक बांधकाम विभागा व्यतिरिक्त अन्य यंत्रणेकडून घेणे उचित ठरत नाही. ही परिस्थिती विचारात घेता,

अ) राज्य शासनाच्या नगर विकास विभागामार्फत अनुदान देण्यात येणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण योजना, वैशिष्ट्यपूर्ण योजना (ठोक), विशेष रस्ता अनुदान तसेच, आण्णा भाऊ साठे नागरी वस्ती सुधार योजना, जिल्हा नगरोत्थान

या जिल्हा योजनेतील हाती घेण्यात येणाऱ्या स्थापत्य कामांना **यापुढे** फक्त सार्वजनिक बांधकाम विभागाकडूनच तांत्रिक मान्यता घेण्यात यावी व त्या आधारेच सक्षम प्राधिकरणाच्या स्तरावर प्रशासकीय मंजुरी देण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

ब) ज्या कामांबाबत यापूर्वीच सार्वजनिक बांधकाम विभागा व्यतिरिक्त अन्य प्राधिकरणाकडे तांत्रिक मान्यतेसाठी आवश्यक ती रक्कम संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने भरली असेल त्यांच्याबाबत त्या त्या प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता घेता येईल. मात्र, यापुढील कालावधीत स्थापत्य कामांसाठी वरीलप्रमाणे फक्त सार्वजनिक बांधकाम विभागाकडूनच तांत्रिक मान्यता घेणे सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांवर बंधनकारक राहील.

क) पाणी पुरवठा विषयक कामांबाबत आवश्यकतेनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१६१६०४२४४६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2017.05.17 13:00:26 +05'30'

**(विवेक कुंभार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.

६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

७. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.

१०. सर्व विभागीय आयुक्त

११. सर्व जिल्हाधिकारी

१२. आयुक्त, सर्व संबंधित महानगरपालिका

१३. मुख्याधिकारी, सर्व संबंधित नगरपरिषदा

१४. मुख्याधिकारी, सर्व संबंधित नगरपंचायती

१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१७. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१८. निवडनस्ती, (नवि-१६)